केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन करण्याकरीता Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer नियुक्त करण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टीसीसी-२०२२/प्र.क्र.३२/आ-३ अ

१० वा मजला, संकुल इमारत
गो.ते.रुग्णालय आवार, मुंबई-४००००१
दिनांक : १४ फेब्रुवारी , २०२२

**वाचा:-**

१) Government of India, Ministry of Finance, Department of Expenditure, No. १ (१३) PFMS/FCD/२०२०, दिनांक २३.०३.२०२१

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दिनांक ०१.०७.२०२१

३) सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्यरोग), मुंबई यांचे पत्र क. संआसे/कक्ष-८अ/SNA/Nodal Officer/नियुक्ती/१६५-६८/२२, दिनांक २८.०१.२०२२

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधीविनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने दिनांक २३.०३.२०२१ च्या पत्रान्वये दिनांक ०१.०७.२०२१ पासून सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत. सुधारित कार्यपध्दतीनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी संबंधीत प्रशासकीय विभागाने एका Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करुन त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Nodal Bank Account उघडावे. त्यासोबतच योजनेच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उपसचिव दर्जाच्या अधिकाऱ्याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्यात यावी. केंद्र शासनाच्या सदर सूचनांच्या अनुषंगाने वित्त विभागाने दिनांक ०१.०७.२०२१ रोजी परिपत्रक निर्गमित केले असून निधी वितरणाच्या सुधारित कार्यपध्दतीची अंमलबजावणी माहे जुलै, २०२१ पासून

करावयाची असल्याने केंद्र पुरस्कृत योजनांची अंमलबजावणीकरणाऱ्या सर्व संबंधीत प्रशासकीय विभागांनी Single Nodal Agency आणि Nodal Officer यांच्या नियुक्तीचे आदेश दिनांक ०५.०७.२०२१ पर्यंत निर्गमित करण्याबाबत कळविण्यात आले आहे. त्यामुळे Single Nodal Agency आणि Nodal Officer यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशानुसार Tertiary Care Program (TCP) हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम राबविण्यासाठी Single Nodal Agency म्हणून खालीलप्रमाणे घोषित करण्यात येत आहे.

| Scheme | Single Nodal Agency |
|---|---|
| Tertiary Care Program (TCP) | State Health Society, Maharashtra (TCP) |

२. सदर योजनेच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उपसचिव दर्जाचा अधिकारी म्हणूण सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना Nodal Officer म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या सूचनांनुसार Single Nodal Agency ( State Health Society, Maharashtra (TCP) यांनी स्टेट बँक ऑफ इंडिया अथवा सक्षम माहिती तंत्रज्ञान प्रणाली असलेल्या अन्य राष्ट्रीयकृत बँकेत खाते Single Nodal Agency (SNA) उघडण्याची कार्यवाही करावी.

४. तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन अनुक्रमांक ०२ च्या परिपत्रकातील अन्य सर्व सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी Nodal Officer यांची राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१४१२३०४३७३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK
NIVARTTI
KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=40fdba39a26dd429d5be80f9cd7699890
6ed5012a776fbe5072661d97c2c56c9,
pseudonym=BF4C0C742439A64408C0621CD1FF
33CD1AD8C6B9,
serialNumber=C351F74FB3439ACA71466FCFBB2
509C3310AE753E395A89FFA7C6E3887B0AADF,
cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2022.02.14 12:53:34 +05'30'

(दी. नि. केंद्रे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर.

२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

३. संचालक (१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई

५. सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्यरोग), मुंबई

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

८. नियोजन विभाग, (का.१४७२) मंत्रालय, मुंबई.

९. वित्त विभाग (अर्थसंकल्प/कोषा प्रशा.४), मंत्रालय, मुंबई

१०.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.

११.कार्यासन अधिकारी, लेखा/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई

१२.निवडनस्ती (आरोग्य ३-अ)